## नाडर जातीचा पारंपरिकतेपासून आधुनिकतेपर्यंतचा प्रवास

**रॉबर्ट एल. हार्डग्रेव्ह, (ज्यु.) [संकलन : वसंत पळशीकर]**

वेगवेगळ्या जातींमध्ये प्राचीन काळी एकदा जी श्रेणी लावली, प्रत्येक जातीचा जो दर्जा ठरवून दिला त्या दर्जावरच व त्याच स्थानी ती ती जात प्राचीन काळापासून आजपर्यंत, समाधानाने वा नाखुषीने असो, राहिली आहे असा समज बराच काळ प्रचलित होता. पण कोणत्याही एका 'क्षणी' समाजाचे अवलोकन केले तर समाजाची गतिमानता लपते. मोठा कालावधी डोळयासमोर ठेवून पाहिले तर गतिमानता स्पष्ट होते. जातपातींच्या उतरंडीचेही तसेच आहे. आज ज्या जातीचा समावेश क्षत्रियांमध्ये वा वैश्यांमध्ये केला जातो त्या नेहमीच तशा गणल्या गेल्या नव्हत्या. एका टोकाला ब्राह्मण व दुसऱ्या टोकाला अस्पृश्य गणल्या गेलेल्या जाती या त्यांच्या त्यांच्या जागी सामान्यतः स्थिर राहिल्या, पण दरम्यान असलेल्या जातींचे स्थान इतिहासात वरखाली होत गेले.

गाव व भोवतालची पंचक्रोशी या भौगोलिक क्षेत्रापुरतीच बव्हंशी जातीची पोच असे. जात, तिचा दर्जा व क्रमांक ही एक अत्यंत स्थानिक अशी बाब होती, कारण सर्वच जाती सगळ्या गावांतून नसत, आणि जमीनमालकी, लोकसंख्या, पैसाअडका या दृष्टीने सर्वत्र चित्र सारखे नव्हते. चातुर्वर्ण्य व्यवस्था ही एक मुख्यतः वैचारिक अमूर्त संकल्पना होती व सामाजिक वास्तव परिस्थिती त्या संकल्पनेत बसविली जात असे.

अशा रीतीने, मूलतःच ही एक गतिमान व लवचिक अशी व्यवस्था होती. (गतिमान व लवचिक असली तरी माणसा-माणसांत उच्च-नीच, स्पृश्य-अस्पृश्य असा भेद करण्यावर ती आधारलेली होती ही गोष्ट अर्थात विसरता कामा नये.) ब्रिटिश राजवटीच्या प्रस्थापनेनंतर काही काळ येथील समाजव्यवस्थेला धक्का लावू नये हे धोरण अमलात आणले गेले. पण एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीस, या देशाच्या जनतेचा उद्धार केला पाहिजे या भूमिकेतून स्त्रिश्चन धर्मप्रसाराच्या कामास प्रोत्साहन व राजाश्रय मिळाला. आर्थिक, राजकीय परिवर्तनामुळे परिस्थिती अधिकच गतिमान झाली होती. खुली झाली होती. माणसात उच्चनीच भेद करणे, स्पृश्य- अस्पृश्य असा भेद करणे गैर होय हा विचार वातावरणात प्रविष्ट झालेला होता. ब्रिटिश राज्याचा एकछत्री अंमल सर्व देशभर चालू झाल्यामुळे प्रथम एका प्रशासकीय एकात्म तेच्या व त्यातून कालांतराने सर्व क्षेत्रात एकात्मतेच्या दिशेने प्रवाह निर्माण झाले. स्थानिकत्व हा खेडुत समाजजीवनाचा विशेष, त्यावर आघात झाला. शिक्षणाने त्याच कल्पना सर्वदूर पसरल्या, समान आकांक्षा निर्माण झाल्या. त्यातून अनिवार्यपणे समान हितसंबंधियांच्या संघटना निर्माण झाल्या.

व्यावसायिक संघटनांच्याही आधी दोन प्रकारच्या संघटना जागोजाग निर्माण झालेल्या दिसतात. राजकीय, सांस्कृतिक व धार्मिक प्रबोधनासाठी निघालेल्या संघटना व आपापल्या जाती-जमातींचा उद्धार करण्यासाठी स्थापन झालेल्या संघटना. दुसऱ्या प्रकारच्या संघटनांचे उद्दिष्ट स्पष्ट होते. नव्या समाजव्यवस्थेतील संधींचा लाभ आपल्या ज्ञातिबांधवांना अधिक घेता यावा, नोकऱ्या चाकऱ्या, स्थानिक स्वराज्य संस्था यात आपणास आपल्या संख्येच्या प्रमाणात, आपल्या सामाजिक दर्जाच्या प्रमाणात जागा मिळाव्यात, आपला सामाजिक दर्जा कनिष्ठ असला तर तो वाढवून घ्यावा, या

दिशेने या संघटनांचे प्रयत्न राहिले.

'द नाडर्स ऑफ तामिलनाड' या पुस्तकात रॉबर्ट एल. हार्ड ग्रेव्ह, ज्युनियर यांनी नाडर जातीने स्वप्रयत्नांनी आपला दर्जा कसा उंचावून घेतला, राजकीय जीवनात महत्वपूर्ण सहभाग घेण्याइतपत स्वतःची प्रगती कशी घडवून आणली त्याचा इतिहास सांगितला आहे. बृहत्तर समाजाशी झालेल्या या व्यवहाराने नाडर जातीमध्ये कसे अंतर्गत परिवर्तन घडून आले त्याचेही चित्रण त्यांनी केले आहे. आधुनिक भारतात घडून आलेली सामाजिक व राजकीय परिवर्तनाची प्रक्रिया स्पष्ट होण्याच्या दृष्टीने नाडर जातीच्या अलीकडील इतिहासाचे परिशीलन करणे महत्त्वाचे व आवश्यक आहे. कारण नाडर जातीप्रमाणेच इतरही जातींनी भारतात अन्यत्र अशाच मार्गांनी आपला अभ्युदय साधला आहे व आपला अभ्युदय साधत असतानाच आपाततः एका नव्या सामाजिक रचनेला जन्माला घातले आहे.

या नव्या समाजरचनेचा तोंडवळा पारंपरिक वाटतो (कारण जातपातीचे प्राबल्य ' वाढल्याचे' दिसते), पण शंभर वर्षांपूर्वीचा समाज आणि आजचा समाज यात फार साम्य नाही; आजचा समाज सर्वस्वी वेगळा समाज आहे.

तामिळनाडु राज्याच्या मदुराई, रामनाथपुरम्, तिरुनेलवेली आणि कन्याकुमारी या दक्षिणेकडील चार जिल्ह्यांत नाडर जमात मोठ्या प्रमाणात केंद्रित झालेली आहे. या भागात ईस्ट इंडिया कंपनीची सत्ता अठराव्या शतकाच्या अखेरीस प्रस्थापित झाली. कन्याकुमारीजवळचा, केरळशी साम्य असलेला भाग हिरवागार व सुपीक आहे. बाकीचा भाग सपाट व उजाड आहे. त्यापैकी तिरुनेलवेली जिल्ह्याच्या आग्नेय भागात ताडबने खूप आहेत. हा भाग रेताड आहे. झाडझाडोरा फारसा नाही. ही नाडरांची भूमी. ताडाच्या झाडापासून ताडरस किंवा नीरा काढायची हा त्यांचा मुख्य व्यवसाय. नाडरांना अव्वल इंग्रजी काळात शानान वा शानार म्हणत असत.

एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीला ख्रिश्चन मिशनऱ्यांनी या जमातीत प्रवेश केला. त्यांनी त्यांच्याविषयी जे लिहून ठेवले आहे त्यावरून असे दिसते की, शूद्र आणि अस्पृश्य यांच्या मध्ये कोठेतरी त्यांना स्थान होते. काल्डवेलने लिहिले आहे, सर्वांत नीच वर्गातील अगदी वरचा थर किंवा मधल्या वर्गातील सर्वांत खालचा थर असे त्यांच्या स्थानाचे वर्णन करता येईल. ते गरीब आहेत पण भिकारी नाहीत; ते निरक्षर व रांगडे आहेत, पण रानटी नाहीत. "[१]

नीरा काढणे हा त्यांचा पारंपरिक व्यवसाय. हे काम, नीरेपासून ताडी हे मादक पेय तयार केले जात असे म्हणून 'साहचर्या'ने गलिच्छ. तेव्हा हे काम करणारे म्हणून नाडर अस्पृश्यासम ठरले. मद्यपान व गोमांसभक्षण यांचा निषेध, विधवांना पुनर्विवाह करण्यास बंदी, इत्यादी चालीरीतींमुळे ते शूद्रांच्या कोटीत बसविण्यास योग्य म्हणता आले असते. आणि ब्राह्मण आळीत ('अग्रहरम') त्यांना अस्पृश्यांप्रमाणे मज्जाव नव्हता यावरून अस्पृश्यांहून ते काहीसे वेगळे गणले जात हे उघड होते. पण अस्पृश्यांप्रमाणेच त्यांना उच्च जातीच्या मंडळींपासून ठराविक अंतर राखून बोलावे चालावे लागे, त्यांना मंदिरांतून प्रवेश नव्हता, न्यायालयांमध्ये त्यांना बाहेर उभे राहूनच दादफिर्याद लावून घ्यावी लागत असे, त्यांच्या बायकांना कमरेवरचा भाग वस्त्राने झाकण्यास बंदी होती, आणि त्यांची घरे अस्पृश्यवस्ती इतकी दूर नसली तरी गावकुसाबाहेर असत.

ब्राह्मण हे सर्वांहून श्रेष्ठ. पण या भागात ब्राह्मण फार थोडे होते. आर्थिक व राजकीय सामर्थ्याच्या दृष्टीने वरचढ जात शैव वेल्लाळांची होती. हे जातीने शूद्र असले तरी ब्राह्मणांच्या खालोखाल त्यांना विधिविहित स्थान व सामाजिक प्रतिष्ठा होती. वेल्लाळ हे पिळे आडनाव लावीत. ते कडक शाकाहारी होते व त्यांची जीवनाची धाटणी थेट ब्राह्मणी होती. वेल्लाळांच्या खाली नायकर आणि रेड्डियार या तेलगु जातींचा क्रमांक होता, त्यानंतर मरवारांचा. मरवार हे तलवार गाजविणारे म्हणून प्रसिद्ध व नाडरांचे कर्दनकाळ. नाडर अस्पृश्यात पूर्णपणे मोडत नसले तरी त्यांच्या स्पर्शाने विटाळ होतो अशी धारणा होती.

अंबत्तन (न्हावी) व वण्णन् (धोबी) जातींचे स्थान नाडरांच्या खालचे होते. पळ्ळ व परैया या दोन जाती सर्वांत नीच व अस्पृश्य गणल्या गेलेल्या होत्या. जातींच्या क्रमवार रचनेत सर्व नाडरांना एकच स्थान दिले जात असले तरी, फक्त नाडरांचा विचार करता, नाडरांमध्ये श्रेष्ठ-कनिष्ठ, गरीब- धनिक, अडाणी हुशार असे भेद होतेच. काही मालक तर इतर त्यांचे सेवक होते. काही जमीनदार तर इतर त्यांची कुळे, चाकर असे होते. सर्वच नाडर काही नीरा काढून त्यावर पोट भरीत नसत. काही शेतीवर गुजराण करीत, काही व्यापारावर आपला उदरनिर्वाह चालवीत, काही हमालीवर मिळेल त्या मोलमजुरीवर. पण बहुसंख्यांचा धंदा नीरा काढण्याचा होता. ताडबने खूप होती. तामिळ प्रदेशात जेथे जेथे ताडबने आढळत तेथे नीरा काढण्याचे काम नाडरांकडे होते.

निरेपासून फक्त ताडीच केली जात होती असे नाही. निरेपासून गूळ बनविला जात असे. उसापासून बनविलेला गूळ व साखर अस्तित्वात नव्हत्या तेव्हा या निरेपासून बनविलेल्या गुळाला खूप मागणी असे व याचा व्यापार धनिक नाडर मंडळीच्या हाती असे. या गुळाचा 'अरक' नावाची कडक दारू (नेटिव्ह 'जिन' म्हणून प्रसिद्ध असलेली) तयार करण्यासाठी पण उपयोग होत असे.

काही भागात गावेच्या गावे बहुसंख्य नाडर वस्तीची होती. तेथे वेगळेच समाजजीवन आकारास येई. नाडर व इतर असा भेद ठळक असण्यापेक्षा नाडरांमधील आपापसातील भेदभाव, गटबाजी महत्त्व पावत असत. पण या 'नाडरभूमी'च्या पलीकडे, गावोगाव जी नाडर कुटुंबे विखुरलेली, एकेका गावात पाच पंधरा अशी, असत त्यांना सर्व प्रकारच्या अप्रतिष्ठेचे, दारिद्र्याचे बळी व्हावे लागे. त्यांची स्वतःची जमीन तर नसेच, पण ताडीच्या झाडांचे मालकही वेगळे असत. या गावोगावच्या नाडरांची अवस्था दुसऱ्यांच्या दयेवरच सर्वस्वी अवलंबून असलेल्या आश्रितांची होती.

नारांपैकी नीरा काढण्यावर आपले पोट भरणारे ते सर्वांत हीन. त्यांचे जीवन अतिकष्टाचे. वर्षातून सहा महिने नीरा काढण्याचे काम पुरे. उरलेल्या दिवसांत गावात, शेतावर मिळेल ती मोलमजुरी ते करीत. यातील काहींचे स्वतःच्या मालकीचे ताड असत किंवा जमिनीचा छोटा तुकडा असे. पण बहुसंख्य अगदी दरिद्री होते. नाडरांमध्ये नाडन म्हणून एक लहान उप-जातगट होता. हे नाडरभूमीतले मोठे जमीनदार. ऐतिहासिक काळात करभारवसुलीचे काम यांच्याकडे असे. यांना वेल्लाळ वा ब्राह्मण पण मान देत इतकी यांची प्रतिष्ठा व संपन्नता होती. हे परैय्या वा पळ्ळ जातीचे गुलाम पदरी बाळगीत. त्यांनी मोठमोठी देवळे बांधली. देवळांतून महापूजेसाठी ते व्यवस्था करीत. पण अखेरीस ते नाडरच, व

म्हणून त्यांना देवळात तेवढा प्रवेश नसे. त्यांचा स्पर्शही तेवढाच विटाळकारक मानला गेला होता. नाडन आणि इतर नाडर यांच्यात रोटीव्यवहार होत असे पण बेटीव्यवहार होत नसे. नाडन इतर नाडरांपासून अंतर राखून असत.

नाडरांमध्ये अनेक उपजाती असल्याची नोंद आढळते. पण पाच मुख्य उपजाती आहेत. नाडरांच्या आपापसातील संबंधांच्या दृष्टीने त्यांना आजही काही महत्त्व आहे, पण इतर जातींशी व विशेषतः तामीळ समाजात व्यवहार करताना सर्व नाडर आज एकच आहेत. ब्रिटिश अंमलापूर्वी अशी परिस्थिती नव्हती. तेव्हा वेगवेगळ्या राजांच्या राज्यात नाडर समाज विभागलेला होता. या रेताड, उजाड प्रदेशात दळणवळण कठीण होते. पंचक्रोशी ही बेटीव्यवहाराच्या संबंधांची मर्यादा होती. नाडरभूमीत नाडरांचा इतर जातियांशी संबंध अगदी कमी होता. त्यांचे सामाजिक जग हे नाडन जमीनदारांच्या आपापसातील स्पर्धा, वैरे, गटबाजी यांनी भरलेले होते. आपण सर्व एकाच जातीचे आहोत, आणि आपल्या सामाजिक, राजकीय व आर्थिक अभ्युदयासाठी आपण एकवटून प्रयत्न केले पाहिजेत या सांघिक भावनेचा अभाव होता.

जेसुइट ख्रिश्चन मिशनऱ्यांचा नाडरांशी पहिला संपर्क १६८० साली आला. त्या वर्षी एक नाडर बाई ख्रिश्चन झाली. १६८५ मध्ये चर्च बांधले गेले. १७१३ पर्यंत त्या एका पंचक्रोशीत ख्रिश्चन नाडरांची संख्या चार हजारांवर होती. अँग्लिकन मिशनरी तिन्नेवेलीत १७७१ मध्ये आले. पुढच्या अर्धशतकाच्या कालावधीत नाडरांमध्ये ख्रिश्चन धर्माचा प्रसार पुष्कळच झाला. एका मिशनऱ्याच्या म्हणण्याप्रमाणे दक्षिण त्रावणकोर भाग व तिन्नेवेली तालुका यांत मिळून १८५० च्या सुमारास सुमारे ६०।६५ हजार ख्रिश्चन होते. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत स्त्रिश्चन मिशनऱ्यांच्या कार्याचा प्रभाव वाढत गेला. नाडरांमधील अगदी हीन उपजातीत किंवा जमीनदार नाडन उपजातीत ख्रिश्चन धर्मांतर फारसे झाले नाही. नीरा काढण्याच्या व्यवसायात गुंतलेल्या मधल्या थरात धर्मांतर अधिक झाले.

ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या बरोबर शिक्षणाचा प्रवेश झाला. सांस्कृतिकदृष्ट्या ख्रिश्चन नाडर हे अधिक सुधारलेले उमटून दिसत. त्यांना आत्मप्रतिष्ठा लाभली. पण त्याहीपेक्षा ब्रिटिश राजवटीने नव्या प्रकारच्या आर्थिक संधी निर्माण केल्या. सिलोन, मलाया व इतर देशांतून मळ्यांमध्ये काम करण्यास नाडर समाजातील माणसे मजूर म्हणून मोठ्या प्रमाणावर जाऊ लागली. १८४३ ते १८६७ च्या दरम्यान जवळपास पंधरा लाख लोक मद्रास प्रेसिडेन्सीमधून आपला गाव सोडून सिलोनी मळ्यांमध्ये काम करण्यास गेले आणि त्यांतील निम्म्याहून अधिक पैसाअडका साठवून परत आले. त्यांनी जमिनी विकत घेतल्या, दुकाने थाटली. म्हणजे एक क्रांतिकारक परिवर्तन नकळत समाजरचनेत घडून आले. मजुरीसाठी परदेशात जाणाऱ्यांमध्ये तिन्नेवेलीतील नाडरांचे प्रमाण खूप मोठे होते. या नाडरांपैकी बरेच जण ख्रिश्चन धर्म स्वीकारलेले होते. थोडीशी आर्थिक स्थिती सुधारली की स्वतः नीरा काढण्याचा उद्योग सोडावा, कोणास तरी हाताखाली ठेवून मालक म्हणून तो धंदा करावा किंवा शेती विकत घ्यावी किंवा दुकान टाकावे याकडे प्रवृत्ती होती. यामुळे नीरा काढणारे लोक मिळेनासे झाले, इतका सामाजिक फरक पडला. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यानंतर फार मोठ्या संख्येने नाडर जमीनमालकांच्या संख्येत वाढ झाली. त्यापूर्वी खानदानी नाडन घराण्यांच्या हातीच जमिनी होत्या, पण आता लहान लहान तुकडे स्वतःच्या मालकीचे असलेले हजारो जमीनमालक अस्तित्वात आले. या लहान

तुकड्यांतून अपार कष्टाने नाडर शेतकरी पीक काढी, उजाड माळातून हिरवाकंच मळा फुलवी, खोल जाऊन पाणी वर काढी.

हिंदू नाडरांपेक्षा ख्रिश्चन नाडरांत संघभावना अधिक होती. नव्या जगाचे भान त्यांच्या ठिकाणी अधिक होते. पारंपरिक हिंदू समाजाचे घटक म्हणून जे अवमानकारक निर्बंध त्यांना पाळावे लागत, आर्थिक जीवनात जी लाचारी पत्करावी लागे त्यापासून सुटका करून घेण्याची संधी धर्मांतरामुळे मिळाली. नाडर समाजाचा एक भाग त्या वेळच्या त्रावणकोर संस्थानात रहात असे. त्रावणकोर संस्थान हे कर्मठ नंबुद्री ब्राह्मणांच्या वर्चस्वाखाली होते. नाडरांना वेठबिगार करावी लागे, नंबुद्री ब्राह्मणापासून ३६ पावले व नायर व्यक्तीपासून १२ पावले अंतर राखावे लागे; नाडर माणसास छत्रीचा वापर करावयाची, पायताण घालावयाची, दागिने घालण्याची बंदी होती. एक मजल्याहून त्यांना उंच घरे बांधण्यास परवानगी नव्हती. नाडर स्त्रियांना कमरेवरून पाण्याच्या घागरी नेण्यास, कमरेच्या वरचा भाग झाकण्यास बंदी होती. नाडरांवर जबर कर होता. नाडरांची स्थिती जवळपास गुलामांसारखी होती.

ब्रिटिश अंमलाखाली राहणारे यांचेच बांधव खूप मुक्त अवस्थेत रहाताना पाहून त्रावणकोर संस्थानातील नाडरांना आपल्या विरुद्धच्या अन्यायाची तीव्र जाणीव झाल्यास ते स्वाभाविकच होते. त्यामुळे ते ख्रिस्ती धर्माकडे वळले. ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या प्रयत्नांमुळे त्यांच्यावरील जाचक कर दूर झाले, वेठबिगार बंद झाली. आर्थिक लाचारी व गुलामी बऱ्याच प्रमाणात दूर झाली. पण सामाजिक अप्रतिष्ठा चालूच राहिली.

ख्रिस्ती संस्कृतीमध्ये स्त्रियांनी उरोभाग उघडा टाकणे गैर मानलेले होते. ख्रिस्ती व मुस्लिम मोपला स्त्रियांना ज्या प्रकारची चोळी घालायची परवानगी होती त्या प्रकारची चोळी घालण्यास ख्रिस्ती नाडर स्त्रियांना १८१४ साली परवानगी देण्यात आली. पण ब्रिटिश राजवटीखालील भागात आपल्या भगिनी प्रतिष्ठित जातींतल्या स्त्रियांसारख्या चोळ्या राजरोस घालीत असता आपण तशा घालू शकत नाही हे त्रावणकोरमधील ख्रिस्ती नाडर स्त्रियांना मान्य झाले नाही व त्या सर्रास उच्चवर्णीय स्त्रियांसारखेच उत्तरीय नेसू लागल्या.

नाडरांचे सुधारणेचे प्रयत्न, त्यांची वाढत्या प्रमाणावरील आर्थिक स्वायत्तता, त्यांचे स्वतःचा सामाजिक दर्जा उंचावण्याचे प्रयत्न यांमुळे त्रावणकोरमधील नायर जमीनदारांचा रोष झाला. नाडर लोक माजलेत, अशी त्यांची भावना झाली. ही सर्व मिशनऱ्यांची करणी म्हणून त्यांच्याविरुद्धही नायर जमात चवताळून उठली. १८२८ साली ठिकठिकाणी नायर जथ्यांनी नाडरांवर, मिशनच्या शाळांवर, उपासनागृहांवर हल्ले केले. दंगल माजवून नाडरांना धाकदपटशाने वठणीवर आणणे, आपली पायरी ओळखून वागण्यातले शहाणपण पटवून देणे हा त्यांचा हेतू होता.

त्रावणकोरच्या राजाने फर्मान काढून 'ब्राह्मणांची बरोबरी करण्याचा नाडर स्त्रियांचा प्रयत्न' गैर असल्याचे जाहीर केले. इतरांप्रमाणेच ख्रिश्चन नाडरांना वेठबिगार परत सक्तीची केली. सरकारच्या परवानगीशिवाय चर्च बांधण्यास बंदी केली.

बायकांनी चोळी घालावी की नाही, उत्तरीय नेसण्याचा त्यांना अधिकार आहे की नाही यावरून जरी वादंग माजलेले

असले तरी वस्तुतः नीच गणल्या गेलेल्या जातींच्या अभ्युदयाच्या प्रयत्नातून अपरिहार्यपणे उद्भवलेला हा व्यापक, सर्वस्पर्शी संघर्ष होता. आपल्या बदललेल्या, सुधारलेल्या शैक्षणिक, सांस्कृतिक व आर्थिक स्थितीनुसार आपणास सामाजिक दर्जा मिळाला पाहिजे अशी ख्रिश्चन व हिंदू, दोन्ही प्रकारच्या नाडरांची थोडक्यात मागणी होती. जेथे नाडरच प्रामुख्याने होते तेथे त्यांचा इतर जातींच्याशी संबंध येत नव्हता, तेथे त्यांचा झगडा जातीतल्याच उच्चतर व धनिक नाडन घराण्यांशी होता. त्रावणकोरमध्ये त्यांचा संघर्ष नायर जमीनदारांशी आला.

परंपरा आणि आधुनिकता यांच्या या झगड्यात स्वार्थ- ख्रिश्चन नाडरांची बाजू आपण घ्यायची नाहीतर कोणी? - आणि परमार्थ - माणसामाणसात उच्च-नीच असे भेद योग्य नाहीत - दोन्ही कारणांतून ब्रिटिश सत्तेला नाडरांची बाजू घेणे भागच होते.

या संघर्षातून नाडर समाजास स्वतःच्या अस्मितेची ओळख पटली, मिशनरी संघटनेच्या यंत्रणेमुळे सर्वदूरचे नाडर एकत्र येण्यास मनाने व संघटनात्मक दृष्टीने एक आयता सांगाडा मिळाला.

ख्रिश्चन झाल्याने नाडर समाजाची जातभावना विलयास तर गेली नाहीच, पण अधिक तीव्र बनली. त्यामुळे हिंदू समाजात आपणास नीच, जवळजवळ अस्पृश्य मानले जाते ही गोष्ट नाडरांना जास्त बोचू लागली. केवळ हिंदूच त्यांना हीन लेखत होते असे नाही. ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या लेखनातही नाडरां विषयीचे उल्लेख फारसे चांगले नव्हते. नाडरांनी आपले स्थान वस्तुतः वरचे आहे असा दावा करणे ख्रिश्चन मिशनऱ्यांनाही पसंत नव्हते. ही एक मोठी उपरोधिक गोष्ट होती. ख्रिश्चन होऊनही जो तो आपापली जात कायम राखत असे आणि या गोष्टीस त्रिश्चन मिशनऱ्यांची व चर्चची अलिखित मान्यता होती. त्यामुळे नाडरांनी जातींच्या उतरंडीतले आपले खालचे स्थान न स्वीकारता उच्च स्थानावर दावा सांगणे ही गोष्ट त्यांना अडचणीत आणणारी होती. पण ख्रिश्चन होऊनही, आपली शैक्षणिक व आर्थिक परिस्थिती सुधारूनही आपण अप्रतिष्ठित स्थानच स्वीकारायचे असेल आणि तेही कायमचे तर मग हा सारा खटाटोप अखेरीस कशासाठी हा प्रश्न नाडरांसमोर असणार.

नाडर समाजात, नाडरांचा उगम व त्यांचा इतिहास याबद्दलच्या आख्यायिका प्रसृत होत्या. या वेगवेगळ्या आख्यायिकांमध्ये एक सूत्र समान होते. ते असे की, नाडर हे एके काळी राजे होते आणि पुढे कधीतरी त्यांचा पराभव झाल्यावर त्यानंतर त्यांना पददलितांचे स्थान पत्करणे भाग पडले. काही भागांमध्ये प्रामुख्याने नाडरांचीच वस्ती होती ही गोष्ट लक्षात घेतली तर कधीकाळी नाडरांच्या प्रदेशात नाडरांचे राज्य होते ही गोष्ट खरी असणे अशक्य नाही. एरवीही, नाडरांमधील काही घराणी एकोणिसाव्या शतकातही जमीनदार होती व त्यांची आर्थिक-राजकीय ताकद बरीच होती व त्यांना समाजात मानही होता ही वस्तुस्थिती असल्याचे आपण वर पाहिलेच आहे.

समाजात आपणास वरचे स्थान मिळावे असा प्रयत्न करणाऱ्यांना, समाजात प्रसृत असलेल्या आख्यायिकांचा वापर करावासा वाटणे ही अगदी स्वाभाविक गोष्ट होती. आता आमची परिस्थिती सुधारलीय, आम्ही आमची राहणी चांगली केलीय, सुसंस्कारांचे ग्रहण केले आहे तर आता आम्हाला उतरंडीत वरचे स्थान द्या असे म्हणण्याची (व ते म्हणणे

आपले स्वीकृत होण्याची) सोय जातिव्यवस्थेत नव्हती. मुळात स्थान वरचेच होते, अन्यायाने आपणास खालचे स्थान दिले गेले आहे हा दावा (हा दावा करणारे स्थानिक पातळीवर पुरेसे सत्तासंपन्न असले तर) मात्र मान्य होण्याची अधिक शक्यता होती व इतिहासात तसे घडत आले होते. नाडरांना परंपरेने दिले गेलेले स्थान आणि त्यांची भौतिक-सांस्कृतिक परिस्थिती यात पुरेसा तीव्र विसंवाद निर्माण झालेला होता. नाडरांचे प्रयत्न नवीन नव्हते, ज्या राजकीय- प्रशासकीय चौकटीत ते हा प्रयत्न करीत होते ती चौकट नवी होती. आपले राज्य प्रस्थापित झाले तेव्हा जातींच्या उतरंडीत ज्याचे जे स्थान होते ते कायम ठेवण्याची, ही रचना प्राचीन काळापासून अशीच होती या समजुतीखाली, ब्रिटिश राजवटीची भूमिका होती आणि नाडर किंवा आणखी कोणी, कितीही सामर्थ्यवान झाले तरी, अखेरीस सर्वसत्ताधीश ब्रिटिश होते.

ख्रिश्चन मिशनऱ्यांची व चर्च संघटनेची आपणास अनुकूलता नाही हे पाहून काही ख्रिश्चन नाडरांनी आपले एक वेगळेच चर्च स्थापन केले. काही काळ एका लहानशा भागात त्याला अनुयायीही मिळाले. कालांतराने ही फुटीर चळवळ थंडावली. पण या चळवळीच्या निमित्ताने जे वादंग माजले व वादळ निर्माण झाले त्यामुळे नाडरांमध्ये अस्मिता व संघभावना निर्माण होण्यास खूप चालना मिळाली. १८५७ च्या सुमारास नाडरांत पहिला “खरा” इतिहास, वेगळे चर्च स्थापन करणाऱ्या सत्तमपिळ यांनी लिहिला. तो अप्रकाशित राहिला. पुढील ७५ वर्षांत अशी "खरा" इतिहास सांगणारी चाळीस लहानमोठी पुस्तके लिहिली गेली. नाडरांमध्ये आत्मविश्वास, काहीशी प्रौढीदेखील -जी आवश्यक होती हे ध्यानात ठेवले पाहिजे - निर्माण करण्यात ही पुस्तके यशस्वी झाली. आपण क्षत्रिय आहोत याला प्रमाण आधार म्हणून नाडर या नाडर समाजाच्या "इतिहासा"तील आख्यायिकांकडे बोट दाखवीत. आपल्या चालीरीती उच्चवर्णियांसारख्या आहेत - जे "ब्राह्मणीकरण" ब्रिटिशांशी संपर्क आल्यापासून जाणीवपूर्वक चालू केले होते - हा आपण क्षत्रिय असल्याचा पुरावा म्हणून ते सादर करीत. त्यांच्या हातातील धन आणि त्यांचे शिक्षण या त्यांच्या प्रयत्नांना चालना देणाऱ्या गोष्टी होत्या. या खऱ्या इतिहासांना बाकीच्या समाजाने फारशी कधी मान्यता दिली नाही. पण पुढे, वेगळ्या कारणांमुळे, नाडरांचा दावा मान्य झाला आणि एका अर्थाने या पुस्तकांची गरजही संपली.

ब्रिटिश राजवटीने सर्वत्र शांतता प्रस्थापित केली. सर्वदूर एक राजवट प्रस्थापित केली. दळणवळण वाढले. व्यापार वाढला. औद्योगिक कच्चा माल म्हणून काही प्रकारचा शेतमाल खरेदी करणे - विकणे याला महत्त्व आले. हे जे अर्थव्यवस्थेचे बाजारीकरण झाले त्या परिवर्तनाचा फायदा पारंपरिक व्यवस्थेत रुतून बसलेल्या जातींना व वर्गांना घेता आला नाही. पण जे याप्रकारे बंधनात नव्हते किंवा जे बंधन मोडण्यास तयार होते त्यांना या बदलत्या परिस्थितीचा चांगला फायदा उठविता आला. नाडर समाजात काही गट व्यापार करीतच होते.

पण ब्रिटिशपूर्व काळात व्यापारही पंचक्रोशीपुरता मर्यादित होता. गूळ, खारवलेले सुके मासे, मीठ या वस्तू घेऊन त्यांच्या विक्रीसाठी आठवडी बाजारांतून नाडर फिरत. ब्रिटिश अमलात व्यापाराच्या संधींचा विस्तार झाला त्या वेळी या नाडर मंडळींनी नवनव्या बाजारपेठा काबीज केल्या. सहा जागी त्यांनी तटबंदीआड आपल्या संरक्षित वसाहती स्थापन केल्या: शिवकाशी, विरुधुनगर, तिरुमंगलम, सत्तनकुडी, पालयमपट्टी आणि अरुपुकोट्टाई. रामनाड जिल्ह्यातच ही सहा ठिकाणे होती. हळूहळू या गावांतून नाडर व्यापाऱ्यांची वस्ती वाढली, ही गावे संख्येने व अन्य दृष्टीने नाडरांच्या

प्रभावाखाली आली.

अडत्ये, व्यापारी व सावकार यांनी भारतीय अर्थव्यवस्थेवर किती जबरदस्त पकड बसविलेली होती हे वेगळे सांगायला नको. आजही ती पूर्णतया सुटलेली नाही. थोड्याच अवधीत रामनाड जिल्ह्यात स्थायी झालेला हा नाडर जातीतला उपगट धनवान व शक्तिमान झाला. पण मूळ तिन्नेवेलीतील नाडरभूमीत सगळेच नाडर होते. येथे भोवतालचा सारा समाज नाडरेतर होता. मरवार, रेड्डियार व नायकर जमाती या त्या भागातील किसान जमाती. त्यांच्या लेखी नाडर हे जवळपास अस्पृश्य. व्यापारी - सावकार माणसांबद्दल समाजात एक लाचारी असते तशीच तीव्र द्वेषाची भावना असते. रामनाडमधील नाडरांनाही आपण अप्रिय आहोत या गोष्टीचे भान होतेच. परक्या मुलुखात येऊन पडलेल्या या नाडरांनी एक घट्ट संघटन निर्माण केले असल्यास नवल नाही. या गावांत जेवढी नाडर कुटंबे असतील त्यांमधून घरटी एक माणूस घेऊन एक नाडर पंचायत (उरविनमुरई) स्थापन केली जाई. या पंचायतीच्या हाती नाडर जमातीच्या व्यवहारांबाबत सर्वंकष अधिकार असत. नाडर पंचायतीची निधी गोळा करण्याची पद्धती पुढीलप्रमाणे होती. नाडरांनी स्थापन केलेल्या बाजारपेठेचा जे व्यापारी फायदा घेत त्या सर्वांकडून करभार वसूल केला जाई. या पैशातून देवळे, धर्मशाळा, विहिरी, नव्या बाजारपेठांची वसती, इत्यादी कामे केली जात. उदाहरणार्थ, शिवकाशीच्या नाडरांनी या निधीतून मद्रास व त्रावणकोर प्रांतातील ९६ लहानमोठ्या गावांमधून आपल्या जमातीच्या व्यापाऱ्यांसाठी संरक्षित बाजारपेठा वसविल्या.

गावोगावच्या या पंचायती, त्यांचे या सहा गावच्या पंचायतीकडे परंपरेने चालत आलेले नेतृत्व, यांमुळे सर्व नाडरांची संघटना उभी करणे हे तसे सोपे काम होते. हळू हळू समाजाची आर्थिक परिस्थिती उत्तम झाली, सामाजिक-सांस्कृतिक जागृती आली तशी केवळ व्यापारउदीम, पारंपरिक तंटे सोडविणे, देवळे बांधणे, विहिरी-धर्मशाळांच्या सोयी करणे यांसारख्या कामांच्या जोडीला आधुनिक उद्दिष्टांचाही स्वीकार केला गेला. प्रामुख्याने ही उद्दिष्टे अशी सांगता येतील : आपल्या जातीचा दर्जा उंचावणे, त्या दृष्टीने आपल्या जमातीयांच्या राहणीत, चालीरीतींत, संस्कारांमध्ये अनुरूप बदल घडवून आणणे, ताडीचा गलिच्छ व्यवसाय टाळणे, शाळा काढून शिक्षण वाढविणे, नवे उद्योगधंदे सुरू करण्यास सहाय्य देऊन अभ्युदय घडवून आणणे, इत्यादी.

मंदिरात प्रवेश नाकारला जातो ही घोर अप्रतिष्ठा मानली जावी ही आश्चर्याची गोष्ट नाही. कारण येथील सर्वच जातीजमाती धार्मिकवृत्तीच्या होत्या. तेव्हा, साहजिकच, मंदिरप्रवेशाचा हक्क प्रस्थापित करणे हा उत्कर्षाच्या वाटेवरील जातींचा एक मानबिन्दू बनत असला तर नवल नाही. रामनाड जिल्ह्यातील या नाडरांनी मंदिरप्रवेशासाठी सामदामदंडनीतीचा उपयोग करून पाहिला. अगदी थेट प्रिव्ही कौन्सिलपर्यंत प्रकरण नेले. पण काही उपयोग झाला नाही. त्यांच्या या प्रयत्नाने वेल्लाळ, मरवार, नायकर, रेड्डियार हे उच्चजातीय चिडले मात्र. आणि यातून एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस दंगली उद्भवल्या. गावोगावच्या नाडर कुटुंबियांवर हल्ले झाले, त्यांची घरेदारे जाळून टाकून त्यांना गावाबाहेर काढून लावले. शिवकाशी या नाडर गावात तर दोन पक्षांत युद्धच झाले.

या सगळ्याचा परिणाम एवढा मात्र झाला की नाडरांच्या आकांक्षांना फार दूरवर प्रसिद्धी मिळाली. त्यांची उन्नत आर्थिक स्थिती, त्यांच्यात घडून आलेल्या सुधारणा, शिक्षणाचा झालेला प्रसार, प्रत्यक्षात ते जे व्यवसाय करीत होते त्यांचा प्रतिष्ठितपणा एका बाजूला आणि त्यांना मिळणारी अप्रतिष्ठित वागणूक दुसऱ्या बाजूला यांतील तीव्र विसंवाद लोकांच्या लक्षात आला.

पण बदलत्या वातावरणात जातींच्या उतरंडीत आपले स्थान उंचावणे, मंदिरप्रवेशाचा हक्क प्रस्थापित करणे या धार्मिक चौकटीतील उद्दिष्टांचे महत्त्वच एकाएकी फार कमी झाले. उतरंडीत आपले स्थान वरचे असणे, मंदिरात जाता येणे याने राजकीय सत्ता प्राप्त होईलच असे नव्या राजवटीत सांगता येत नव्हते. सरकारी प्रशासनात अधिकाराच्या जागा मिळणे, विधिमंडळात प्रतिनिधित्व मिळणे याला महत्त्व होते. त्यासाठी इंग्रजी शिक्षणाची आवश्यकता होती. सरकारदरबारी दाद फिर्याद लावून घेण्याची गरज होती. घटनात्मक सुधारणांचे पहिले हप्ते मिळू लागले होते : स्थानिक स्वराज्य संस्था अस्ति त्वात आल्या होत्या; गव्हर्नरच्या कौन्सिलवर, विधिमंडळावर नेटिव सभासदांची नियुक्ती होऊ लागली होती. ही नवी सत्ताकेंद्रे काबीज करण्याची गरज होती. उच्चवर्णीय आधीच संघटित झाले होते.

१८९० नंतर मद्रासभरच्या नाडरांची एक संघटना उभी करण्याचे प्रयत्न सुरू झाले. १८९५ साली पहिला प्रयत्न झाला. पण तो टिकला नाही. १९१० साली दुसरा प्रयत्न तंजावर जिल्ह्यातील पोरैय्यार गावच्या रत्तिनास्वामी नाडर यांच्या पुढारीपणाखाली झाला. या गृहस्थांना- हे अत्यंत धनाढ्य व सरकारदरबारी वजन असलेले, दारूच्या गुत्त्यांचे मोठे कंत्राटदार गृहस्थ होते - राजकीय महत्त्वाकांक्षा होती. विधिमंडळावर सरकारने आपली नेमणूक करावी अशी त्यांची इच्छा होती. पण 'तुम्हांला कसे नेमायचे, आम्ही जातीच्या संघटनेच्या प्रतिनिधीला नेमतो' असे उत्तर मिळाल्यान यांनी नाडरांची प्रांतिक संघटना स्थापन करण्यात पुढाकार घेतला. लौकरच रत्तिनास्वामींचे व नाडर महाजन संगमच्या पहिल्या अध्यक्षांचे निधन झाल्याने संघटना दुबळी राहिली. १९१७ साली परत तिचे पुनरुज्जीवन झाले. रामनाड व मदुराई जिल्ह्यांतील नाडरांचा या संघटनत भरणा असावा ही गोष्ट स्वाभाविक होती.

१८७१ नंतर दर दहा वर्षांनी जनगणना होऊ लागली. जनगणनत व्यक्तीची जात, त्याचा परंपरागत व्यवसाय, जातीचे पारंपरिक उच्च-नीच स्थान या सर्वांची अधिकृतपणे नोंद होत असे. जातींच्या उतरंडीची अशी औपचारिकपणे नोंद होऊ लागल्यान तीत एक साचेबंदपणा नव्याने निर्माण झाला. आणि त्यास प्रतिक्रिया म्हणून जनगणनमध्ये आपल्या जातीची नोंद कशी व्हावी याविषयी विविध जाती जाणीवपूर्वक भूमिका घेऊ लागल्या. अशा रीतीने जनगणनेने सामाजिक परिवर्तनाच्या प्रक्रियस मोठी चालना दिल्याचे आढळते!

१९११ च्या जनगणनेच्या वेळी नाडरांनी आपल्या नाडर महाजन संगमच्या वतीने असे निवेदन दिले की नाडरांची नोंद आजवर शानार/शानान म्हणून केली गेली, त्यांचा 'नीरा काढणे' हा व्यवसाय नोंदविला गेला, ते आता बदलावे. 'क्षत्रिय - शान्ड्रोर' म्हणून त्यांची नोंद व्हावी व ते जो प्रत्यक्ष व्यवसाय करीत असतील तो नोंदवावा. १९११ साली, जे आपली जात जशी सांगतील तशी ती नोंदली जावी, असा निर्णय दिला गेला. पण अर्थातच ही सवलत समाधानकारक नव्हती.

कारण बहुसंख्य नाडर अद्यापही नीरा काढण्याचा व्यवसाय करीत होते ही वस्तुस्थिती होती.

१९२० साली काँग्रेसने असहकाराचा लढा पुकारला. ब्रिटिश राजवटीस आपल्या राज्यास समाजात पाठिंबा व आधार मिळविण्याची आवश्यकता वाटली. परिणामी, काँग्रेसमध्ये ब्राह्मण व तत्सम उच्चवर्णियांचे प्रभुत्व आहे हे लक्षात घेऊन, इतर जातियांना हाताशी धरण्याचे धोरण जाणूनबुजून स्वीकारले. त्यासाठी त्यांच्या प्रमुख मागण्या मान्य करण्यात आल्या. उदाहरणार्थ, नाडरांना १९२१च्या जनगणनेत जात-नाव बदलून दिले गले, परंपरागत व्यवसायांची नोंद करणे बंद केले, क्षत्रियत्वावरील दावा मान्य केला नाही तरी ते हीन जातीय नाहीत हे मान्य केले गेले, इत्यादी. सरकारी नोकऱ्या-चाकऱ्यांमध्ये व लोकनियुक्त प्रतिनिधींसाठींच्या जागांमध्ये राखीव जागा ठेवण्याचे धोरण अंगीकारले गेले.

नाडर जेव्हा राजकारणात उतरले तेव्हा त्यांना समाजातल्या इतर जातियांशी सलोख्याचे संबंध प्रस्थापित करणे इष्ट वाटू लागले. त्यावेळपावेतो - म्हणजे १९२१ पर्यंत - परंपरेने नाडरांचे स्थान हीन असले तरी प्रत्यक्ष समाजजीवनात त्यांना, म्हणजे त्यांच्यातील पुढारलेल्या व सधन गटांना -हीन म्हणून वागणूक देणे थांबले नव्हते. प्रतिष्ठा मिळाल्यानंतर इतरांविषयींचा कडवटपणा कमी झाला असल्यास नवल नाही. १९२० नंतर मद्रास प्रांतात जस्टिस पार्टीचे राजकारण प्रभावी ठरले. या राजकारणात नाडरांनी जस्टिस पार्टीला साथ दिली. नाडरांनी जाणूनबुजून कडवी राजनिष्ठ भूमिका घेतली होती. जस्टिस पार्टीचे राजकारणही राजनिष्ठ भूमिकेतूनच चालले होते.

मद्रासेत, इतरत्रप्रमाणेच, नवे समतावादी विचार प्रसृत होत होते. मद्रासेत त्यांना आर्यद्विष्टेपणाचा एक पदर प्रथम पासूनच होता. इ. व्ही. रामस्वामी नायकरांच्या 'सेल्फ- रिस्पेक्ट' चळवळीचा एक मोर्चा दक्षिणेतील ब्राह्मण संस्कृतीविरुद्ध होता. १९२० नंतरच्या काळात नाडरांचे नेते नायकरांच्या प्रभावाखाली आले. पूर्वी, आपली राहणी, विधीकर्मे, चालीरीती ब्राह्मणांवर बेतण्यावर भर होता. आता ब्राह्मणी वळण टाकण्याचा आग्रह निर्माण झाला. लग्नास ब्राह्मण भटजी न बोलावण्याची रीत पडली.

आतापर्यंत आपण काहीशा ढोबळपणे नाडर समाज हा शब्द वापरला. म्हणजे असे की, सर्व ठिकाणचे नाडरजातीय एकमेकांसारखेच आहेत असे गृहीत धरले, त्यांचे हितसंबंध समान आहेत असे आपण मानले. आता या चित्रातील गुंतागुंत लक्षात घेणे आवश्यक आहे. साधारणपणे १८६० ते १९२० या सत्तर वर्षांच्या अवधीत नाडर समाजात जे प्रवर्तन घडून आले त्याची पोच त्या समाजातल्या पुढारलेल्या गटापर्यंतच होती. १९२० नंतरच्या गांधीयुगात या प्रवर्तनाचा प्रवेश बहुजन, दलित नाडरांमध्ये झाला. म्हणून १९२० नंतरच्या काळातील घडामोडी समजावून घेण्यासाठी गुंतागुंतीत शिरले पाहिजे.

जातीचा दर्जा उंचवावा, आपल्या आर्थिक-शैक्षणिक स्थितीनुसार आपणास सत्तास्थाने मिळावीत यासाठी प्रामुख्याने रामनाड व मदुराई जिल्ह्यांत स्थायिक झालेल्या नाडरांनी प्रयत्न केले, नाडर महाजन संगम ही संघटना उभी केली. या प्रयत्नात सधन, शिकलेल्या, सुधारकी नाडरांचा पुढाकार असावा ही गोष्ट अगदी स्वाभाविक होय. तिन्नेवेली

जिल्ह्यातील मूळ नाडरभूमीत तिरुचेंदूर तालुक्यात दारिद्र्यात, अज्ञानात राहणाऱ्या, नीरा काढण्याचा व्यवसाय करणाऱ्या वा मोलमजुरीवर गुजराण करणाऱ्या सामान्य नाडर जनतेविषयी एक अवघडलेपण या सुधारकी मंडळींच्या वर्तनात, दृष्टिकोनात आढळून येऊ लागले. कारण या सामान्य जनतेला आपले म्हणण्याने आपल्या दर्जा उंचावण्याच्या प्रयत्नात अडथळा निर्माण होतो ही गोष्ट त्यांच्या लक्षात आली. कारण या बहुसंख्य नाडरांचा व्यवसाय नीरा काढणे हा होता ही वस्तुस्थिती नाकारणे शक्य नव्हते, आणि ही वस्तुस्थिती स्वीकारल्यानंतर, नीरा काढणे हा गलिच्छ व्यवसाय आहे हे ते स्वतः ही मानत असल्यामुळे, आम्ही उच्च जातीतले आहोत हा दावा इतर जातियांकडून मान्य करून घेणे कठीण. म्हणून मग, नीरा काढण्याचा व्यवसाय करणारे शानार, त्यांचा आमचा काही संबंध नाही असे म्हणण्यापर्यंत मजल गेली. नाडरांनी नीरा काढणे सोडून द्यावे असे प्रयत्न केले गेले. पण जेथे ताडबनांखेरीज इतर प्रकारची वन्य संपत्ती नव्हती, जमीनही रेताड होती, तेथे आपण हा व्यवसाय सोडतो असे सर्वसामान्य नाडर माणूस कसे म्हणणार?

तात्पर्य, व्यापार, नोकरी, पांढरपेशी व्यवसाय इत्यादी मार्गांनी सधन व प्रतिष्ठित बनलेल्या नाडरांचे आणि तिन्नेवेली जिल्ह्याच्या मागास भागात दाटीवाटीने राहणाऱ्या नाडरांचे हितसंबंध सारखे नव्हते. ते विरोधी होते. ही गोष्ट सर्वकाळ दडून राहणे शक्य नव्हते.

गांधींचे, क्रांतिकारक सामाजिक परिवर्तनाचा आशय घेऊन आलेले राजकारण सत्ताधाऱ्यांच्या विरोधात उभे असल्याने ते बुजुर्ग नाडर समाजाला रुचले नाही. गांधी यशस्वी होण्याने ब्रिटिश राजवटीचे छत्र तर जाणार होतेच, पण त्यांच्या स्थानालाही सामान्य जन आव्हान देणार होते. रामनाड, मदुराई जिल्ह्यातील, नाडर महाजन संगमचा कणा असलेले स्थलांतरित नाडर जस्टिस पार्टीत, काँग्रेसच्या विरोधात तर मूळ नाडरभूमीतले, जनसामान्य, दलित नाडर काँग्रेसमध्ये असे चित्र १९२० नंतर निर्माण होण्याची इतरही कारणे आहेत.

रामनाड - मदुराई या भागात ब्राह्मण विरुद्ध इतर मध्यम जाती असा व्यवहारात संघर्ष होता, असा व्यवहारात संघर्ष होता, नाडरभूमीत दलित नाडर विरुद्ध जमीनदार नाडर व जमीनदार वेल्लाळ- जे जस्टिस पार्टीत होते - असा संघर्ष होता हे त्याचे एक प्रमुख कारण.

गांधींच्या राजकारणाला नाडर समाजातील गोरगरीब थरातून पाठिंबा मिळाला. राजगोपालाचारींच्या नेतृत्वाखालील मंत्रिमंडळाने मंदिरप्रवेशाचा कायदा केला, कनिष्ठ जातींवरचे विविध निषेधात्मक निर्बंध दूर करणारा कायदा केला. त्यामुळे, वर्षानुवर्षे ज्या गोष्टींसाठी झगडा दिला, आणि ज्या गोष्टी जस्टिस पार्टीच्या हाती सत्ता असूनही साध्य झाल्या नाहीत त्या काँग्रेसने अमलात आणल्या म्हणून काँग्रेसच्या बाजूने अनुकूल हवा निर्माण झाली. एव्हाना जस्टिस पार्टी अंतर्गत जाड्य, तणाव यांमुळे विस्कळित व विघटित झाली होती. हळू हळू नाडर समाज काँग्रेसच्या मागे आला. मद्रासेतील काँग्रेसच्या ताकदीचा एक आधारस्तंभ बनला.

नाडर समाजात एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस व विसाव्या शतकाच्या सुरुवातीस पुष्कळसा एकजिनसीपणा आला. कारण जी उद्दिष्टे त्याला साध्य करावयाची होती त्यांसाठी संघटित फळी उभी करणे आवश्यक होते. पण

शिक्षण वाढले, विविध व्यवसायांत नाडर मंडळी पुढे आली, ठिकठिकाणी सधन नाडरांचा वर्ग निर्माण झाला, तसा हा एकजिनसीपणा संपुष्टात आला. विशेषतः १९३० नंतर गांधी युगातील पुरोगामी राजकारणाने बहुजिनसीपणा निर्माण होण्यास एकदम गती मिळाली.

काही बाबतीत अद्यापही जात म्हणून नाडर जातियांचे समान हितसंबंध होते. जातीला एक समान गतेतिहास होता, सांस्कृतिक एकात्मता होती. त्यामुळे स्वजातियांच्या अभ्युदयासाठी विविध दिशांनी - व्यापार, उद्योगधंदा यांना वित्तपुरवठा करण्यासाठी बँक काढणे, शाळा-कॉलेजे काढणे, सामाजिक सुधारणा घडवून आणणे, एका संघटनेत एकत्र आणणे, इ. प्रयत्न करीत राहण्याची गरज होतीच. नाडर समाजातील पुढाऱ्यांचे मोठेपण व दूरदृष्टी अशी की आपल्यातले राजकीय मतभेद तीव्र होत आहेत याचे भान झाल्यावर पक्षीय राजकारणी भूमिका दूर ठेवून नाडर महाजन संगमचे कार्य चालू ठेवण्याचा निर्णय त्यांनी घेतला व तो आजतागायत पाळलेला आहे. आज नाडर जमात ही तामिळनाडूमधील एक अत्यंत सुसंघटित, आपल्या हितसंबंधांविषयी जागरूक, पुढारलेली व सामर्थ्यशाली जमात आहे. व्यापारात, उद्योगधंद्यांत, व्यवसायांत ही जमात पुढे आहे. राजकारणात ती एकवटून एका पक्षात नाही. जस्टिस पार्टीच्या काळात काँग्रेसच्या विरोधात अनेक वर्षे व्यक्तिमत्त्वाचा विकास ग. वि. अकोलकर काम केलेले व म्हणून आजही काँग्रेसविषयी प्रतिकूल मानस असलेले बुजुर्ग नाडर पुष्कळ आहेत. काँग्रेसच्या पाठीशी असणारा एक मोठा गट आहे. पण नाडर समाजातील पुष्कळ तरुण द्रमुकच्याकडे आकृष्ट झाले आहेत.

नाडर जातीचा इतिहास पाहिला तर जात संघटनांनी आधुनिक भारताच्या घडणीत जे कार्य बजावले वा आज बजावीत आहेत ते स्पष्ट होते. भारतीय समाजजीवनाच्या दीर्घ परंपरेची पार्श्वभूमी लक्षात घेऊन बोलावयाचे तर, जातीच्या आधारे एकत्र आलेला गट हा एक स्वाभाविक ('नॅचरल') गट आहे. या स्वाभाविक गटातून सभासद नोंदवून नाडर महाजन संगमसारखी जात-संघटना अस्तित्वात येते म्हणून मर्यादित अर्थाने ती जातीय असते. पण आधुनिक अर्थव्यवहारांमध्ये, समाजजीवनात यशस्वी होणाऱ्या अ-पारं- परिक व्यक्ती जात संघटना स्थापन करतात, पंचक्रोशी व जातपंचायत यांच्या तटबंदी मोडून एक विशाल एककेंद्री संघटन उभे करतात, आधुनिक व ऐहिक उद्दिष्टे समोर ठेवतात, या गोष्टींवरून निवाडा केल्यास जात-संघटना समाजाचे पारंपरिकातून आधुनिकतेत परिवर्तन घडवून आणण्याचे एक अत्यंत प्रभावी साधन असल्याचे सिद्ध होते. सर्वसामान्य भारतीय व्यक्तीस जात, कुटुंब, गाव या परिचित गोष्टी आहेत.

जात या परिचित गोष्टीपासून सुरूवात करून त्याला अपरिचित अशा लोकशाही राजकीय प्रक्रियेत परिणामकारकरीत्या सहभागी करून घेण्याचे काम जातसंघटना करते. आणि, सर्वांत उपरोधाची गोष्ट अशी की, जातसंघटना आपली एहिक उद्दिष्टे ज्या प्रमाणात गाठते त्या प्रमाणात जातीच्या अंतर्गत व्यवसाय व विचारप्रणाली यांचे वैचित्र्य वाढते, आर्थिक व सांस्कृतिक हितसंबंधांनुसार गट पडू लागतात व राजकारणाला, समाजकारणाला जातीय रंग देणे दिवसेंदिवस अशक्य होऊन बसते. जात-संघटनेच्या काट्यानेच, अशा रीतीने जातीयतेचा काटा निघतो.

*१. रॉबर्ट काल्डवेल, द तिन्नेवेली शानार्स, (मद्रास, १८४९ पहिली आवृत्ती), पृ. ५*